**सर्वसाधारण बदल्या सन २०१५**
**महाराष्ट्र वैद्यकीय व आरोग्य सेवा,गट- अ**
**जिल्हा शल्य चिकित्सक संवर्ग**

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक आरोग्य विभाग**
**शासन आदेश क्रमांकः बदली-२०१५/प्र.क्र.१८८ (११)/सेवा २**
गो.ते.रुग्णालय इमारत संकुल,१० वा मजला,
मंत्रालय, मुंबई ४०० ००१.
दिनांक : २ जुलै, २०१५.

**शासन आदेश :-**

शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम,२००५ मधील कलम ४ (४) (एक) (दोन) व ४ (५) मधील तरतुदींनुसार महाराष्ट्र वैद्यकीय व आरोग्य सेवा, गट अ वेतनश्रेणी रु.१५६००-३९१०० ग्रेड पे ६६०० मधील जिल्हा शल्य चिकित्सक संवर्गातील अधिकाऱ्याची खालीलप्रमाणे बदलीने पदस्थापना करण्यात येत आहे:-

| अधिकाऱ्याचे नांव व सध्याची पदस्थापना | बदलीचे कारण | बदलीने पदस्थापना |
|---|---|---|
| डॉ. (श्रीमती) गौरी राठोड, जिल्हा शल्य चिकित्सक, सामान्य रुग्णालय,ठाणे | प्रशासकीय | सहायक संचालक, आरोग्य सेवा ( मा.अ.प्रत्या.),मुंबई (डॉ.केम्पीपाटील यांच्या बदलीने रिक्त होणाऱ्या पदी) |

२. बदली करण्यात आलेल्या अधिकाऱ्यास त्यांच्या नवीन पदस्थापनेच्या ठिकाणी हजर होण्याकरीता तात्काळ कार्यमुक्त करण्यात यावे आणि संबंधित अधिकाऱ्याने त्यांना दिलेल्या पदस्थापनेच्या ठिकाणी त्वरीत हजर होऊन त्याबाबतचा अहवाल संचालक, आरोग्य सेवा, मुंबई व शासनास सादर करावा.

३. बदली झालेल्या अधिकाऱ्यांना कोणत्याही प्रकारची रजा मंजूर करण्यात येऊ नये अन्यथा रजा मंजूर करणाऱ्या सक्षम प्राधिकाऱ्याविरुध्द शिस्तभंगविषयक कारवाई करण्यात येईल.

४. बदली झालेल्या अधिकाऱ्यांनी त्यांना कार्यमुक्त केल्यानंतर, अनुज्ञेय पदग्रहण अवधीत त्यांनी नवीन पदस्थापनेवर रुजू व्हावे. जे अधिकारी या कालमर्यादेचे पालन करणार नाहीत आणि पदस्थापनेच्या ठिकाणी हजर न होता परस्पर गैरहजर राहतील, अशा अधिकाऱ्यांची अनुपस्थिती “अनधिकृत अनुपस्थिती” म्हणून समजण्यात येईल व पर्यायाने त्यांच्या सेवेत खंड होईल याची जाणीव सर्व संबंधीतांना करुन देण्यात येत आहे.

५. संचालनालयाने जे अधिकारी त्यांच्या पदस्थापनेच्या ठिकाणी हजर होणार नाहीत, त्यांचेविरुध्द वेळीच प्रशासकीय कारवाई सुरु करावी व आवश्यकतेनुसार सदर प्रस्ताव शासनाच्या मान्यतेसाठी सादर करावा. या प्रकरणी वेळोवेळी शासनास अवगत करावे व अनुपालन अहवाल शासनास विहित कालमर्यादेत सादर करावा.

६. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक क्र. २०१५०६३०१७४५५२००१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

GHODKE VISHNUDAS PUNDLIKRAO

Digitally signed by GHODKE VISHNUDAS PUNDLIKRAO
DN: CN = GHODKE VISHNUDAS PUNDLIKRAO, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = PUBLIC HEALTH,CID - 918117
Date: 2015.07.02 12:54:55 +05'30'

(वि.पुं.घोडके)
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१) संचालक, आरोग्य सेवा,मुंबई
२) सहसंचालक, आरोग्य सेवा (अर्थ व प्रशासन), मुंबई
३) उपसंचालक, आरोग्य सेवा, मुंबई मंडळ,ठाणे
४) महालेखापाल (लेखा परिक्षा), महाराष्ट्र-१ मुंबई /महाराष्ट्र-२ नागपूर
५) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र-१ मुंबई /महाराष्ट्र-२ नागपूर
६) जिल्हा शल्य चिकित्सक, सामान्य रुग्णालय, ठाणे
७) अधिदान व लेखा अधिकारी,मुंबई
८) मा. मंत्री (आरोग्य) यांचे खाजगी सचिव
९) प्रधान सचिव(आरोग्य) यांचे स्वीय सहायक
१०) डॉ. (श्रीमती) गौरी राठोड, जिल्हा शल्य चिकित्सक, सामान्य रुग्णालय,ठाणे
११) निवडनस्ती